**महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, कार्यालयाच्या बांधकाम दुरुस्ती खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डायट-२०१८/प्र.क्र.५/प्रशिक्षण**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १३ फेब्रुवारी, २०१९

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे या कार्यालयाच्या इमारतीचे नूतनीकरण व दुरुस्तीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याकरिता संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे यांनी शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. अंदाजपत्राकानुसार खालील कामांच्या रु. १०८,२३००/- (एक कोटी आठ लाख तेवीस हजार) इतक्या रकमेस शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

| **अ.क्र.** | **कामाचे नांव** | **प्रशासकीय मान्यता रक्कम रुपये** |
|---|---|---|
| १ | महाराष्ट्र राज्य विद्या प्राधिकरण, सदाशिव पेठ, कुमठेकर मार्ग पुणे येथील कार्यालयीन इमारतींची दुरुस्ती करणे (प्लॅस्टर, जलरोधिकरण, फरशी इत्यादी) | ४२,२२,९३३ /- |
| २ | महाराष्ट्र राज्य विद्या प्राधिकरण, सदाशिव पेठ, कुमठेकर मार्ग पुणे येथील कार्यालयीन इमारतींची दुरुस्ती करणे (प्लॅस्टर, जलरोधिकरण, फरशी इत्यादी) | ५४,८८,१४५ /- |
| ३. | महाराष्ट्र राज्य विद्या प्राधिकरण, सदाशिव पेठ येथील इमारतीसाठी पाण्याची भूमिगत टाकी बांधणे | ११,११,६४१ /- |
| | **एकूण** | १,०८,२२,७१९ /- |

प्रशासकीय मान्यतेच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत:-

१. तरतूद उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष बांधकामास सुरूवात करू नये.
२. ढोबळमानाने करण्यात आलेल्या तरतूदीचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करून सदर अंदाजपत्रकांना सक्षम प्राधिकरणाचे तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

३. सदर बांधकामाकरिता आवश्यकता असल्यास महानगरपालिका, तत्सम प्राधिकरणाची मंजूरी/ नाहरकत प्रमाणपत्रे बांधकाम सुरू करण्यापूर्वी प्राप्त करण्यात यावीत.

४. सदरची कामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ठेव तत्वावर (Deposits Works) करून घ्यावीत.

५. सदर कामांचा खर्च - ४२०२ ६२२८ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१३१५२८०३८३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2019.02.13 15:30:51 +05'30'

**( बी. आर. माळी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
३) महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
४) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे.
५) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
६) कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती, प्रशिक्षण.